एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत राबवावयाच्या कार्यक्रमांची केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२२/प्र.क्र.२३६/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ जुलै,२०२३

**संदर्भ:-** १) केंद्र शासनाचे पत्र क्र. ११/४/२०२१-CD-I (e-९५७०६), दि. ०१.०८.२०२२ व त्यासोबतच्या सक्षम अंगणवाडी व पोषण २.० बाबतच्या मार्गदर्शक सूचना.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. CD-II-१४/७/२०१७-CD-II (Comp No. ४३६४८), दि. १२.०९.२०२२
३) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील दिनांक २७.०२.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेनेंतर्गत विविध कार्यक्रम राबविण्यात येतात. सध्या राबविण्यात येत असलेल्या कार्यक्रमांमधील उणिवा दूर करून या कार्यक्रमांची अंमलबजावणी अधिक प्रभावीपणे होण्याकरिता केंद्र शासनाने या सर्व कार्यक्रमांचा समावेश सक्षम अंगणवाडी आणि पोषण २.० यामध्ये केला असून याबाबत संदर्भाधीन दि. ०१.०८.२०२२ रोजीच्या आदेशान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. या अंतर्गत सद्यस्थितीत राबविण्यात येणा-या योजना / कार्यक्रम पैकी काही योजना / कार्यक्रम यांचे निकष / दर कार्यकक्षा इत्यादी मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सुधारित निकषानुसार विविध कार्यक्रम राज्यात राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवा योजना मधील सक्षम अंगणवाडी व पोषण २.० अंतर्गत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार खालीलप्रमाणे योजना / कार्यक्रम सुधारित निकषानुसार राज्यात राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अं.क्र. | योजना | पूर्वीचे दर / सूचना | सुधारित दर / सूचना | निकष |
|---|---|---|---|---|
| १. | **केंद्र पुरस्कृत किशोरवयीन मुलींकरिता योजना** (SAG) **केंद्र व राज्य हिस्सा ५०:५०** | राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये ११ ते १४ वर्षे वयोगटातील शाळाबाह्य मुलींकरिता | राज्यातील ४ आकांक्षित जिल्ह्यांमधील (गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम ) वय वर्षे १४ ते १८ या वयोगटातील मुलींकरिता Nutritional Norms च्या आधारे राबविण्यात यावी. | Nutritional Norms:-<br>1. Nutritional Status of the AG: While identifying AGs, focus shall be on the following:<br>• Undernourished AGs i.e. AGs with below normal Body Mass Index (BMI).<br>• AGs having less weight |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | w.r.t their height.<br>• AGs having less weight w.r.t their age.<br>• AGs who are anemic.<br>**2.** AGs belonging to families performing poorly on the socio-economic caste census. |
| २. | **अंगणवाडी केंद्राचे सक्षम अंगणवाडीमध्ये श्रेणीवर्धन (Upgradation) केंद्र व राज्य हिस्सा ६०:४०** | ---- | अंगणवाडी केंद्राचे सक्षम अंगणवाडीमध्ये श्रेणीवर्धन (Upgradation) रुपये १ लाख रकमेच्या मर्यादेत करणे. | राज्यातील गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम या आकांक्षित जिल्ह्यांमधील केंद्र शासनाने निवड केलेल्या स्वमालकीच्या अंगणवाडी केंद्रांत १) पोषण वाटीका, २) रेन वॉटर हार्वेस्टिंग, ३) आर.ओ. युनिट, ४) एल.ई.डी., ५) अदर इन्फ्रास्ट्रक्चर इत्यादी सुविधा रु. १ लाखच्या मर्यादेत उपलब्ध करून देणे. |
| ३. | **अंगणवाडी कर्मचा-यांकरिता साडी / गणवेश केंद्र व राज्य हिस्सा ६०:४०** | प्रति वर्ष २ साड्यांकरिता रुपये ४००/- प्रति साडी प्रमाणे वार्षिक रुपये ८००/- | प्रति वर्ष २ साड्यांकरिता रुपये ५००/- प्रति साडी प्रमाणे वार्षिक रुपये १०००/- | अंगणवाडी कर्मचा-यांना साडी करिता शासन निर्णय दि. २०.०७.२०१७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे DBT पध्दतीने निधी उपलब्ध करून देण्यात यावा. |
| ४. | **अंगणवाडी केंद्रात शौचालय बांधकाम केंद्र व राज्य हिस्सा ६०:४०** | प्रति शौचालय रुपये १२,०००/- इतका निधी अनुज्ञेय. | प्रति शौचालय रुपये ३६,०००/- इतका निधी अनुज्ञेय. | केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अंगणवाडी केंद्रामध्ये शौचालय बांधकाम करताना लहान मुलांना शौचालयाचा वापर सुलभपणे करता येईल याची खबरदारी घेऊन बांधकाम करण्यात यावे. याबाबत स्वच्छता विभागाच्या स्वच्छता कृती आराखड्यातील मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन अंगणवाड्यांमध्ये शौचालयाचे बांधकाम करावे. |

२. उपरोक्त कार्यक्रमांची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाने दिलेल्या सुधारित मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन अंमलबजावणी करण्यात यावी. त्यानुषंगाने सदर कार्यक्रम / योजना राबविताना केंद्र / राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना / शासन निर्णय / परिपत्रक मधील तरतुदींचे पालन करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. प्रस्तुत प्रयोजनांकरिता येणारा खर्च हा संबंधित लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येणा-या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१२११५७१८४१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2023.07.13 15:51:30 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,
९) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१४) सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास),
१५) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद,
१६) सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी,
१७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
२१) निवड नस्ती -का-६.